राज्यातील शासकीय व खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांसाठी ऑगस्ट २०१५ या सत्रापासून होणाऱ्या प्रवेशासाठी प्रवेश नियमावली आणि शासकीय व खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांसाठी लागू करावयाच्या प्रशिक्षण शुल्क नियमावलीस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग
**शासन पुरकपत्र क्रमांक : आयटीआय- २०२१/प्र.क्र.१४५/व्यशि-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २९ जुलै, २०२४

वाचा :- उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण- ३३१५/प्र.क्र.१७/व्यशि-३
दिनांक : १४ मे, २०१५

**शासन पुरकपत्र :-**

दिनांक १४ मे, २०१५ रोजीच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये शासकीय व खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रवेशासाठी लागू करावयाच्या प्रशिक्षण शुल्क नियमावलीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. सदर शासन निर्णयामधील परिशिष्ट -१, अ.क्र. १५ ( प्रशिक्षण शुल्क, अनामत रक्कम व सवलत बाबत विवरण) येथील १५.१ मधील विवरणपत्रामध्ये खालील “वार्षिक प्रशिक्षण शुल्क” सदराखाली शासकीय तसेच खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये प्रवेश घेणाऱ्या प्रशिक्षणार्थ्यांसाठी सामूहिक अपघात विमा लागू करण्यास मान्यता देण्यात येत आहे. या अतिरिक्त बाबीचा अ.क्र. १. अ येथे समाविष्ट करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | तपशिल |
|---|---|---|
| १.अ | शासनाने निवडलेल्या शासकीय विमा कंपनीचे अपघात विमा शुल्क | सन २०२५-२६ पासून शासकीय व खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील प्रवेशप्रकियेमध्ये आकारण्यात येणाऱ्या प्रशिक्षण शुल्कामध्ये शासनाद्वारे वेळोवेळी निवडलेल्या शासकीय विमा कंपनीच्या अपघात विमा शुल्काचा समावेश करण्यास मान्यता देण्यात येत आहे. |

२. सन २०२४-२५ या प्रवेश वर्षाकरीता प्रशिक्षण शुल्कामध्ये नमूद “ग्रंथालय शुल्कातून अपघात विम्याकरिता रु. १७ /- एवढी रक्कम National Insurance या विमा कंपनीस अदा करण्यास” एक वेळची विशेष बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन पुरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०२४०७२९१४०९०८४४०३ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASENJEET KARLEKAR

Digitally signed by PRASENJEET KARLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=d219c43caa42a6d2c11a62256b2ff3ad939a420c9fb6fa0cb24c384214bcee8c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=58B95820309E7F466AE2AD722C14D2E8910FE2F9D499461E1829267B19AB9CFC, cn=PRASENJEET KARLEKAR
Date: 2024.07.29 14:23:50 +05'30'

**( प्रसेनजीत कारलेकर )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव, कौशल्य, रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

२. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय (संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय) मुंबई

३. सह सचिव, कौशल्य, रोजगार,उदयोजकता व नाविन्यता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

४. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५. जिल्हा कोषागार कार्यालय (सर्व जिल्हा)

६. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर,

७. सह/ उप संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय, मुंबई

८. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (सर्व) (व्य.शि. व प्र.संचालनालयामार्फत)

९. प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था (सर्व) (व्य.शि. व प्र.संचालनालयामार्फत)

१०. निवडनस्ती / व्यशि-३.